राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम
निधी वितरण- सन २०१४-१५
सर्वसाधारण निधी (General-I)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तंनिका-२०१५/नि.वि./प्र.क्र.३१२/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : ३१ मार्च, २०१५

**वाचा -**

१) संचालक (वित्त), आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र No. G.२५०१२/५/२००९/NRHM Finance, दि.१० फेब्रुवारी, २०१४.
२) केंद्र शासनाच्या आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-II(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/NCD/नस्ती क्र.२६/६११७-२२/१४, दि.१० डिसेंबर, २०१४.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. प्रशामा/प्र.क्र.३०६/आरोग्य-५, दि.१६ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून, या कार्यक्रमासाठी अनुदानाचे प्रमाण, केंद्र शासन ७५% हिस्सा व राज्य शासन २५% हिस्सा असे आहे. या कार्यक्रमास मागील वित्तीय वर्षापर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी थेट कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांना वितरीत केला जात होता. केंद्र शासनाने वरील संदर्भ क्र.१ येथे नमुद दि.१०.०२.२०१४ च्या पत्रान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून दिला जाणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वितरीत करण्याच्या सुचना दिल्या आहेत. त्यानुसार या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारा (१) सर्वसाधारण निधी (General) (२) अनुसूचित जाती क्षेत्राकरिता (Schedule Cast Plan) (३) आदिवासी क्षेत्राकरिता (Tribal Area Sub Plan), अशा तीन वेगवेगळया उप योजनांकरिता राज्याच्या एकत्रित निधीद्वारे निधी उपलब्ध करुन देण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याची रक्कम वितरणासाठी स्वतंत्र लेखाशिर्षे उघडण्यात आली आहेत. या कार्यक्रमांतर्गत (२२१० एफ ३४४-केंद्र हिस्सा) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ साठी सर्वसाधारण निधी(General) म्हणून रु.३.१९ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यापैकी केंद्र शासनाने पहिल्या टप्प्यात आदेश क्र.F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-II(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये रु.२३.८८ लक्ष इतका निधी राज्यास वितरीत केला आहे. सदर निधी कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (२२१० एफ ३४४-केंद्र हिस्सा) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ साठी सर्वसाधारण निधी(General) म्हणून अर्थसंकल्पीत केलेल्या रु.३.१९ कोटी इतकी तरतूदीपैकी केंद्र शासनाने पहिल्या टप्प्यात आदेश क्र.F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-II(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेले रु.२३.८८ लक्ष इतका केंद्र हिश्शाचा निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६ - सार्वजनिक आरोग्य,
८०० - इतर खर्च
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा)
(०१) (३७) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम (रातंनिका)
(२२१० एफ ३४४)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमांतर्गत वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीशी संबंधीत देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी रक्कम संबंधीत कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभाग, व्यय-१३, अर्थोपाय शाखेच्या सहमतीने त्यांच्या अनौसं.३०/२०१५/व्यय-१३,**दि.१०.०२.२०१५,** अनौसं.३२६/२०१४-१५/अर्थोपाय, दि.३०.०१.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११९२५३२२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.03.31 20:29:54 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग-तंनिका) , मुंबई.
५) प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई,
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन- १४७२), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (व्यय-१३) (अर्थसंकल्प-९)/(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).